**महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट-अ (वेतन बँड रु.१५६००-३९१०० + ग्रेड पे रु.५४०० ) या संवर्गातील अनधिकृत गैरहजर असलेल्या वैद्यकीय अधिकाऱ्यांना हजर करुन घेणे व त्यांना पदस्थापना देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अनगै-२०१८/प्र.क्र.३७५/सेवा-३**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत, १० मजला
मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
तारीख: ०४ जानेवारी २०१९

वाचा :- संचालक आरोग्य सेवा मुंबई यांचे पत्र क्र.संआसे/२ब/टे-२/रुजू-पदस्थापना/२ब/१२८१/१८, दि.०६.१२.२०१८

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट-अ (वेतन बँड रु. १५६००-३९१०० + ग्रेड वेतन रु.५४००) या संवर्गातील काही वैद्यकीय अधिकारी हे विविध कारणास्तव प्रदीर्घ काळापासून अनधिकृतरित्या गैरहजर होते. तसेच काही वैद्यकीय अधिकारी शासनाची पूर्व परवानगी न घेता पदव्युत्तर अभ्यासक्रमासाठी गैरहजर होते. सार्वजनिक आरोग्य सेवा ही अत्यावश्यक सेवा असल्याने तसेच विभागांतर्गत वैद्यकीय अधिकाऱ्यांची कमतरता असल्याने सदर अनधिकृत गैरहजर वैद्यकीय अधिकाऱ्यांनी हजर करुन घेण्याबाबत विभागास केलेल्या विनंतीनुसार तसेच संचालक आरोग्य सेवा, मुंबई यांनी संबंधितांना विहीत अटी व शर्तीच्या अधीन राहून हजर करुन घेण्याबाबत शासनास वाचा येथील नमूद पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने संबंधित वैद्यकीय अधिकाऱ्यांना अनधिकृत गैरहजेरी नंतर विहित अटी व शर्तीच्या अधिन राहून शासन सेवेत पुनश्च रुजू करुन घेऊन त्यांना पदस्थापना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट-अ (वेतन बँड रु. १५६००-३९१०० + ग्रेड वेतन रु.५४००) या संवर्गातील काही वैद्यकीय अधिकारी हे विविध कारणास्तव प्रदीर्घ काळापासून अनधिकृतरित्या गैरहजर होते. तथापि, त्यांनी हजर करुन घेण्याबाबत केलेल्या विनंतीनुसार तसेच संचालक आरोग्य सेवा, मुंबई यांनी संबंधित वैद्यकीय अधिकाऱ्यांना विहीत अटी व शर्तीच्या अधीन राहून हजर करुन घेण्याबाबत वाचा येथील नमूद पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने संबंधित वैद्यकीय अधिकाऱ्यांना या परिच्छेदातील तक्त्याखाली नमूद अटी व शर्ती मान्य आहे या

अटीच्या अधिन राहून रूजू करुन घेण्यात येत असून त्यांना वैद्यकीय अधिकारी गट अ या पदावर रुजू होण्यासाठी तशी पदस्थापना खालील तक्त्यात त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्याप्रमाणे देण्यात येत आहे.

| अ. क्र. | वैद्यकीय अधिकाऱ्यांचे नांव | अनधिकृत गैरहजेरीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|
| १ | डॉ महेश शंकरराव महाले | ता आ अ राहुरी जि अहमदनगर |
| २ | डॉ समित एस इनामदार | जिल्हा रुग्णालय रत्नागिरी |
| ३ | डॉ बबन सवखा तडवी | प्रा आ कें तुळई ता मुरबाड जि ठाणे |
| ४ | डॉ अंकुश विजय नवले | प्रा आ कें माळशिरस ता पुरंदर जि पुणे |
| ५ | डॉ सदानंद रामदास बन्सोड | प्रा आ कें मलकापूर पांग्रा ता सिंदखेडाराजा जि बुलढाणा |
| ६ | डॉ समिर देविदास पाटील | ग्रा रु सेलु जि वर्धा |
| ७ | डॉ मंजुषा सानप | प्रा आ कें परिंचे ता पुरंदर जि पुणे |
| ८ | डॉ दिपक कडू ठाकूर | ग्रा रु बोदवड जि जळगाव |
| ९ | डॉ विनायक वसंतराव कोद्रे | जि रु सातारा रक्तपेढी |
| १० | डॉ उत्तम फुले | ग्रा रु सांगोला जि सोलापूर |
| ११ | डॉ हेमंत नगराळे | प्रा आ के राजोली ता मुल जि चंद्रपूर |
| १२ | डॉ सुप्रिया प्रभाकर इगवे | सा रु उदगीर जि लातूर |
| १३ | डॉ संदिप त्रिंबकराव जोगदंड | ग्रा रु भूम जि उस्मानाबाद |
| १४ | डॉ सय्यद अब्दुल वहाब अब्दुल अजीज | ग्रा रु औसा जि लातूर |
| १५ | डॉ अरुन साबळे | उ जि रु कर्जत जि अहमदनगर |
| १६ | डॉ रश्मी निघुट | ता आ अ कारंजा जि वर्धा येथे डॉ रंगारी यांच्याबदलीमुळे रिक्त होणाऱ्या पदी |
| १७ | डॉ स्मिता हणमंत सोनवणे | प्रा आ कें इंदोली ता कराड जि सातारा |
| १८ | डॉ सुनिता सर्जेराव सोळंके | स्त्री रु नेकनूर जिबीड. |
| १९ | डॉ मनिषा जाधव | प्रा आ कें चकलांबा गेवराई जि बीड |
| २० | डॉ कल्पना चौधरी | ग्रा रु सोमर्डी ता जावळी जि सातारा |
| २१ | डॉ जगदिश देवराम पाटील | उ जि रु मुक्ताईनगर जि जळगाव |
| २२ | डॉ योगेंद्र पांडुरंग शेळके | उ जि रु कळंबणी ता खेड जि रत्नागिरी |
| २३ | डॉ अनंत महादेवराव वायबसे | उ जि रु पनवेल जि रायगड |
| २४ | डॉ सचिन सोमनाथ बालकुंदे | ग्रा रु किल्लारी ता औसा जि लातूर |
| २५ | डॉ गोपीकृष्णा पोताजी पाटील | ट्रॉमा केअर सेंटर भोकर जि नांदेड |
| २६ | डॉ सचिन देवढे | ग्रा रु उमराणे ता देवळा जि नाशिक |

| अ. क्र. | वैद्यकीय अधिकाऱ्यांचे नांव | अनधिकृत गैरहजेरीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|
| २७ | डॉ संभाजी डोंगे | उ जि रु पुसद जि यवतमाळ |
| २८ | डॉ मिना रामचंद्र जाधव | उ जि रु निलंगा जि लातूर |
| २९ | डॉ अनिलकुमार मोमले | प्रा आ कें मिरजगाव ता कर्जत जि अहमदनगर |
| ३० | डॉ संदिप भवरे | ग्रा रु देवगाव रंगारी ता कन्नड जि औरंगाबाद |
| ३१ | डॉ सदिप नानाजी ठाकरे | सा रु मालेगाव जि नाशिक |
| ३२ | डॉ विष्णू बाबुराव राठोड | प्रा आ कें सोनपेठ गंगाखेड जि परभणी |
| ३३ | डॉ मोहम्मद अशफाक अशरफ तिनमसवाला | स्त्री रु वसमत जि हिंगोली |
| ३४ | डॉ शारदा रमाकांत धुंदळे | ग्रा रु मंठा जि जालना |
| ३५ | डॉ अरुणकुमार महादेवजी डांगे | ग्रा रु देवलापार ता रामटेक जि नागपूर |
| ३६ | डॉ बबन विठोबा लोखंडे | ग्रा रु माडग्याळ ता जत जि सांगली |
| ३७ | डॉ उत्तम रामचंद्र तपासे | ग्रा रु रुई बारामती जि पुणे |
| ३८ | डॉ क्रांतीराव पोपटराव पवार | प्रा आ कें लोणंद ता खंडाळा जि सातारा |
| ३९ | डॉ अर्चना शिंदे | जि रु ठाणे |
| ४० | डॉ भिमसिंग विकला पावरा | प्रा आ कें जांगठी ता अक्कलकुवा जि नंदूरबार |
| ४१ | डॉ अमोल विश्वनाथ धुळधुळे | ट्रॉमा केअर युनिट हिंगोली (मविका) |
| ४२ | डॉ विलास विठ्ठलराव पाटील | ग्रामीण रुग्णालय कासारशिरसी जिलातूर डॉ कोरे. यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदी |
| ४३ | डॉ श्रीपती कोंडिबाराव शिंदे | प्रा आ कें बिटरगांव ता रेणापूर जि लातूर |
| ४४ | डॉ महेश कडले | प्रा आ कें उंब्रज ता कराड जि सातारा |
| ४५ | डॉ अनिरुध्द सुरेश जाधव | प्रा आ कें पोहरादेवी ता मानोरा जि वाशिम |
| ४६ | डॉ अभय गेबरसिंग राठोड | उ जि रु मुल जि चंद्रपूर |
| ४७ | डॉ दयानंद पवार | प्रा आ कें ढोरजळगाव ता शेवगाव जि अहमदनगर |
| ४८ | डॉ दिपक हुग्गे | उ जि रु निलंगा जि लातूर |
| ४९ | डॉ प्रमोद गोरजी वळवी | ग्रा रु विसरवाडी ता नवापूर जि नंदूरबार |
| ५० | डॉ स्नेहल सुभाष गवळी | ग्रा रु धानोरा जि नंदूरबार |
| ५१ | डॉ भाऊसाहेब जानकर | प्रा आ कें उंबरेपागे ता पंढरपूर जि सोलापूर |
| ५२ | डॉ बसवराज स्वामी | सा रु उदगीर जि लातूर |
| ५३ | डॉ राजश्री बाळासाहेब गित्ते | ग्रा रु केज जि बीड |
| ५४ | डॉ अस्मिता वाघमारे | जि रु उस्मानाबाद |
| ५५ | डॉ बिभिषण देविदास जाधव | ग्रा रु मानवत जि परभणी |
| ५६ | डॉ प्रविणा सुभाषराव देशमुख | ग्रा रु नांदगाव खंडेश्वर जि अमरावती |
| ५७ | डॉ अव्देत प्रजाबराव चौधरी | संदर्भ सेवा रुग्णालय अमरावती |

| अ. क्र. | वैद्यकीय अधिकाऱ्यांचे नांव | अनधिकृत गैरहजेरीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|
| ५८ | डॉ पंकज ध येवले | सा रु भंडारा |
| ५९ | डॉ स्वप्नील वाहाणे | उ जि रु तिरोडा जि गोंदिया |
| ६० | डॉ जयश्री पेटकर | प्रा आ के चिचोली ता सावनेर जि नागपूर |
| ६१ | डॉ सागर नाशिककर | प्रा आ कें म्हसावद ता जि जळगाव |
| ६२ | डॉ करुणा शेखर नाईक | प्रा आ कें गुमथी ता कामठी जि नागपूर |
| ६३ | डॉ स्मिता बिल्लारी | प्रा आ कें कवठा ता रिसोड जि वाशिम |
| ६४ | डॉ राहुल सरदे | ग्रामीण रुग्णालय घोडेगाव ता आंबेगाव जि पुणे |
| ६५ | डॉ सुनिता पवार | जि रु हिंगोली |
| ६६ | डॉ दिप्ती गायकवाड | उ जि रु डहाणू जि पालघर |
| ६७ | डॉ वैशाली गंजेवार | उपजिल्हा रुग्णालय परळी जि बीड |
| ६८ | डॉ कमलाकर जाधव | प्रा आ कें पळसन ता सुरगाणा जि नाशिक |
| ६९ | डॉ मनिष अ बगडीया | ट्रॉमा केअर युनिट गंगापूर जि औरंगाबाद |
| ७० | डॉ मनिष गं मुपकलवार | ग्रा रु सेनगाव जि हिंगोली |
| ७१ | डॉ सुधाकर वा जाधव | प्रा आ कें नळेगाव ता चाकूर जि लातूर |
| ७२ | डॉ एच आर गाढवे | ग्रा रु घोडेगाव ता आंबेगाव जि पुणे |
| ७३ | डॉ किरण किसनराव शिंदे | ता आ अ अचलपूर जि अमरावती |
| ७४ | डॉ अंजली पिंपळे | उ जि रु शहापूर जि ठाणे |

**<u>अटी व शर्ती</u> :-**

(१) संबंधित वैद्यकीय अधिकारी, गट-अ हे अनधिकृत गैरहजर असल्याने त्यांचा अनधिकृत गैरहजेरीच्या दिनांकापासून ते प्रत्यक्षात प्रस्तुत पदस्थापनेच्या पदावर रुजू होण्यापर्यंतचा कालावधी महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ मधील नियम ४७ (१) नुसार सेवेतील खंड समजण्यात येवून सदर अनधिकृत गैरहजर वैद्यकीय अधिकाऱ्यांना रुजू करुन घेण्यात यावे. तसेच त्यांचा उकत गैरहजेरीचा संपूर्ण कालावधी सेवेतील खंड म्हणून समजण्यात येत आहे.

(२) संबंधित वैद्यकीय अधिका-यांना रुजू करुन घेण्यापूर्वी त्यांची वैद्यकीय मंडळाकडून वैद्यकीय तपासणी करुन ते सेवा करण्यास शारीरिक / मानसिकदृष्ट्या सक्षम असल्याबाबत वैद्यकीय मंडळाचे प्रमाणपत्र घ्यावे.

(३) संबंधीत वैद्यकीय अधिकाऱ्यांचा चारित्र्य व वर्तणूक अहवाल (पोलीस तपास अहवाल) घ्यावा. (फौजदारी स्वरुपाचा / तसेच लाचलुचपत प्रतिबंधक कायद्यांतर्गत कोणत्याही स्वरुपाची तक्रार प्रलंबित नसल्याचा पोलीस अहवाल घ्यावा.)

(४) अ .क्र. १ मध्ये नमूद केल्यानुसार अनधिकृत गैरहजेरीपूर्वीची कोणतीही नियमित / अस्थायी सेवा अनधिकृत गैरहजेरीनंतर रुजू करुन घेतल्यानंतरच्या सेवेस जोडून दिली जाणार नाही किंबहुना सेवा सलग करुन मिळणार नाही. तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ मधील नियम ४७ (१) नुसार सेवेतील खंड असल्याने संबंधीत वैद्यकीय अधिकाऱ्यांचा अनधिकृत गैरहजेरीचा कालावधी हा भविष्यात या विषयाच्या अनुषंगाने न्यायालयात दाद मागणार नाही.

(५) अनधिकृत गैरहजरीच्या दिनांकापासून प्रत्यक्ष रुजू होईपर्यंतच्या कालावधीत सदर वैद्यकीय अधिकाऱ्यांनी शासकीय कर्तव्य बजावले नसल्याने त्यांना सदर कालावधीचे वेतन व इतर कोणतेही अनुषंगिक सेवाविषयक लाभ अनुज्ञेय होणार नाहीत, सदर अनधिकृत गैरहजर कालावधीतील कोणतीही रजा मंजूर केली जाणार नाही, सदर कालावधी हा कोणत्याही प्रयोजनार्थ नियमित केला जाणार नाही वा त्यासंबंधी कोणतेही निवेदन विचारात घेतले जाणार नाही. तसेच वर नमूद आशयाचे संमतीपत्र रु. १००/- च्या स्टॅम्प पेपरवर संबंधित वैद्यकीय अधिका-यांकडून संबंधित उपसंचालक, आरोग्य सेवा यांनी घ्यावे.

(६) अनधिकृत गैरहजरीनंतर संबंधित वैद्यकीय अधिकाऱ्यांना रुजू करुन घेण्यात आले तरी गैरहजेरीचा कालावधी तसेच त्यापूर्वीची सेवा विचारात घेतली जाणार नसल्याने संबंधित वैद्यकीय अधिकाऱ्यांना २००५ पूर्वीची जुनी निवृत्तीवेतन योजना लागु राहणार नाही.

(७) रुजू करुन घेण्यात येणाऱ्या संबंधीत सर्व अनधिकृत गैरहजर वेद्यकीय अधिकाऱ्यांना दि.३१/१०/२००५ च्या शासन निर्णयानुसार सुरु केलेली अंशदायी निवृत्तीवेतन योजना जी सद्यस्थितीत NPS योजनेत समाविष्ट झालेली आहे, ती लागु राहील.

(८) संबंधित सर्व वैद्यकीय अधिकाऱ्यांना महाराष्ट नागरी सेवा ( निवृत्तीवेतन) १९८२ नुसार मिळणारे कोणतेही लाभ अनुज्ञेय होणार नाही.

(९) तसेच, भविष्य निर्वाह निधी इ. लाभ देखील मिळणार नाहीत.

(१०) सदर आदेशान्वये अनधिकृत गैरहजर वैद्यकीय अधिकाऱ्यांनी केलेल्या विनंतीनुसार अंतिम संधी देवून त्यांना शासन सेवेत पुनश्च रुजू करुन घेण्यात येत असल्याने, तसेच त्यांना दर्शविलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी विहित वेळेत (१५ दिवसाच्या आत) ते रुजू न झाल्यास त्यांना शासन सेवा करण्यास स्वारस्य नसल्याचे समजून त्यांची सेवा समाप्ती करण्याची कार्यवाही करण्यात येईल. प्रस्तुत आदेशच याबाबत नोटीस समजण्यात येईल. त्यानुसार विहित वेळेत रुजू न होणाऱ्या उक्त तक्त्यातील वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या बाबतीत सदर शासन आदेशच त्यांची सेवा समाप्तीची नोटीस राहणार आहे.

२.  या आदेशान्वये पदस्थापना देण्यात आलेल्या अनधिकृत गैरहजर वैद्यकीय अधिकाऱ्यांनी पदस्थापनेचे सदर आदेश प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून १५ दिवसांच्या आत त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू व्हावे. अन्यथा, सदर पदस्थापनेचे आदेश १५ दिवसानंतर आपोआपच रद्द होतील. कार्यालय प्रमुखाने १५ दिवसानंतर रुजू होणाऱ्या वैद्यकीय अधिकाऱ्यास रुजू करुन घेऊ नये.

३.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१०४१७१३०५५७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Varsha Munjaji Bharose

Digitally signed by Varsha Munjaji Bharose
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2f3096a175796cc670522c4aff97da20b708981b5122e87c8346c4cc7468f821, serialNumber=1bd844032884bbf2167bc99cd85325223aceef69d02bd455b7ca6972491623e0, cn=Varsha Munjaji Bharose
Date: 2019.01.04 17:35:09 +05'30'

**( व. मुं. भरोसे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) आयुक्त आरोग्य सेवा, मुंबई
२) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
३) सहसंचालक (अ. व प्र.) आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
४) उपसंचालक, आरोग्य सेवा (सर्व परिमंडळ)
५) जिल्हा शल्यचिकित्सक (सर्व)
६) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता),मुंबई/नागपुर
७) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
८) जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
९) मा. मंत्री (सा. आ.) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय मुंबई
१०) सर्व संबंधित वैद्यकीय अधिकारी गट-अ (संबंधित उपसंचालक, आरोग्य सेवा यांचे मार्फत)
११) निवड नस्ती सेवा-३